**शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स, नागपूर येथील कामगारांना सण अग्रीम मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अग्रीम-२०१९/प्र.क्र.११७/उद्योग-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- ०८ सप्टेंबर, २०२०

पहा:- १. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. शामुना-२०१३/प्र.क्र.१०३/१३/ उद्योग-४, दिनांक १६ ऑगस्ट, २०१३.
२. शासन निर्णय वित्त विभाग क्र. अग्रिम-२०१५/प्र.क्र.५७/१५/विनियम, दिनांक १६ ऑक्टोबर, २०१५.
३. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. शामुना-२०१३/प्र.क्र.१०३/१३/ उद्योग-४, दिनांक १६ ऑगस्ट, २०१३.
४. शासन निर्णय वित्त विभाग क्र. अग्रिम-२०१८/प्र.क्र.३७/१८/विनियम, दिनांक २३ ऑक्टोबर, २०१८.
५. संचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.आ/ अधी/शिमुना/बोनस-१९-२०/१८८५, दिनांक ०५ ऑक्टोबर, २०१९.

**प्रस्तावना:-**

शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स, नागपूर या मुद्रणालयात कार्यरत असलेल्या मान्यता प्राप्त युनियत सोबत २० मे, १९८६ रोजी झालेल्या करारनाम्यानुसार आजही कामगारांना सणासूदीसाठीव मुलामुलीचे लग्न कार्यासाठी अग्रीम देण्याची पध्दत सुरु आहे. त्यानुसार विभागाच्या दिनांक १६ ऑगस्ट, २०१३ च्या शासन निर्णयानुसार उत्सव अग्रिमाची मर्यादा रु. ५०००/- इतकी करण्यात आली आहे. दरम्यानच्या काळात वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयानुसार शासकीय कर्मचाऱ्यांना उत्सव अग्रिमाची मर्यादा रु. १०,०००/- तसेच संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयानुसार १२,५००/- इतकी करण्यात आली आहे. त्यानुसार या विभागाच्या संदर्भ क्र. ३ च्या अनुषंगाने शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स, नागपूर येथील कामगारांना अनुज्ञेय असलेल्या अग्रीमात यापूर्वीच वाढ करण्यात आली आहे. तथापि, वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ अनुषंगाने शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स, नागपूर मुद्रणालयात कार्यरत असलेल्या कामगारांना सणासाठी अनुज्ञेय असलेल्या अग्रीमात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स, नागपूर मुद्रणालयातील कर्मचाऱ्यांना पुढील सणांसाठी व शासन वेळोवळी घोषित करेल अशा सणांसाठी रु. १२,५००/- (रुपये बारा हजार पाचशे फक्त) इतके सण अग्रीम अनुज्ञेय राहील.

| | |
|---|---|
| १) दिवाळी | ६) रोश-होशाना |
| २) रमझान ईद | ७) वैशाखी पौर्णिमा (भगवान बुध्द जयंती) |
| ३) ख्रिसमस | ८) स्वातंत्र्य दिन |
| ४) पारशी नववर्ष | ९) प्रजासत्ताक दिन |
| ५) संवत्सरी | १०) डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती |

२. अग्रिम मंजूरी आणि वसूलीच्या यापूर्वीच्या अटी व शर्ती कायम राहतील. त्यात बदल होणार नाही.

३. हे आदेश सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून तयाचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००९०८१६०८०८८९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Karansing Premsing Patil

Digitally signed by Karansing Premsing Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, serialNumber=c7feed7178d6c14666a5df36811f1763590e65b6f836a87e63789dc234173d66, cn=Karansing Premsing Patil
Date: 2020.09.08 16:09:06 +05'30'

**( क. प्रे. पाटील )**

**अवर सचिव**

**प्रत:-**

१) संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई

२) महालेखापाल (लेखापरिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र २, नागपूर

३) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर

४) व्यवस्थापक, शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स, नागपूर

५) कक्ष अधिकारी (व्यय-१६/विनियम) वित्त विभाग

६) निवडनस्ती.